श्री आरती गणपतीची ॥ अनादि गणनायका चिंतामणि देवा ॥
विद्याधर तुज ह्मणतो करितो सुर सेवा ॥ नकळे ब्रह्मादिकां पार्व-
तीसुत ठेवा ॥ भावें पहावा गावा निजमानसिं ध्यावा ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय गणपति स्वामी । पंचप्राणी आरति करि-
तों तुजला मी ॥ जयदेव० धृ० ॥ परशू अंकुश कमळां धरिलें
अवलीळा ॥ सिंदुरचर्चितभाळा शोभसि रिपुकाळा ॥ गंडकपा-
ळांकळि पुष्पांच्या माळा ॥ रुणझुण चरणी होतो नूपुर अव-
लीळा ॥ २ ॥ जयदेव० ॥ श्वेतछत्रचामरी तुजला मिरवीती ॥
उंदीराचे वाहन तुजला गणपती ॥ रत्नांचि जाडू शोभती हाती ॥

आरत्या

मूर्ती अवलोकितां न ढळती पातीं ॥ ३ ॥ जयदेव० ॥ राजस
उंदिर टकमक टकमक मग चाले ॥ हालत मारुत दोंदिल डोलत
मग चाले ॥ ध्यानें ध्यातां सर्वहि जन घाले ॥ हरिगुणमंडित
वाणी जन पंडित बोले ॥ जयदेव० ॥ ४ ॥ — आरती विष्णूची ॥

१

जय जय जगनगकनका चिन्मय विधिजनका ॥ सुखकर ब्रह्म परा
त्पर प्रियतर मुनि सनका ॥ भवदलभंजन सुरपति हरि मायाहरका ॥
कमलावर कमलप्रिय चुकवीं भवगरका ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय-
माधव विष्णो, श्रीमाधव विष्णो ॥ व्यापक सर्व चराचर - ब्रह्मचि-
पूर्ण परात्पर प्रसीद भव विष्णो ॥ धृ० ॥ जलचर मच्छहि कच्छ-

वराह हृषिकेशी ॥ नरसिंहाकृतिवामन द्विज रघुपति होसी ॥ यदुपति बौ-
द्धहि कल्की दशविध तनु ऐसी ॥ भक्तजनप्रिय धरुनी जगपालन क-
रिसी जय० ॥ २ ॥ सच्चित्स्वरूपसुखता विसरुनि हे जीव व्यर्थचि अवि-
वेकाने पावति देहभाव ॥ स्मरतां तव पद हृदयीं हढतर सद्भाव ॥ प्रक-
टुनि सद्गुरुरूपें उद्धरसी देव ॥ ३ ॥ जय० ॥ त्वंपद तत्पद माया सकलहि
जगसर्गा ॥ सच्चित्सुख तूं साक्षी विरहित जडवर्गा ॥ साक्षीशब्दहि ग-
ळुनी वससी निजअंगा ॥ अगणित निःशब्दचि तूं असंसी निःसंगा ॥
॥ ४ ॥ जय० ॥ विवर्त जडजग सर्वहि हे माया नसतां ॥ सर्वहि साक्षी
म्हणणें नसेचि मग पाहतां ॥ पदरज वंदित मौनी अभेद समचित्ता ॥ अद्वय

आरत्या

२

अनंत तव पद निर्भय निजसत्ता ॥ ५ ॥ जयदेव ॥ - आरती देवीची ॥
आश्विन शुद्धपक्षीं अंबा बैसली सिंहासनीं हो ॥ प्रतिपदे पासुन घट-
स्थापना ती करुनी हो ॥ मूलमंत्रें जप करुनी भोंवते रक्षक ठेउनी हो ॥
ब्रह्मा विष्णु रुद्र आईचें पूजन करिती हो ॥ उदो बोला उदो अंबाबाई
माउलीचा हो ॥ उदोकारें गर्जती काय महिमा वर्णूं तिचा हो ॥ धृ० ॥
द्वितीयेचे दिवशीं मिळती चौसष्ट योगिनी हो ॥ सकळां मध्यें श्रेष्ठ परशुरामा
ची जननी हो ॥ कस्तूरीमळवट भांगीं शेंदुर भरुनी हो ॥ उदोकारें गर्जती
समस्त चामुंडा मिळुनी हो ॥ उदो० ॥ तृतीयेचे दिवशीं अंबे शृंगार मांडि
ला हो ॥ मळवट चोळी पातळ कंठीं हार मुक्ता फळा हो ॥ कंठीचीं पदकें

कांसे पीतांबर कसिला हो ॥ अष्टभुजा मिरविती अंबे सुंदर दिसे लीला
हो ॥ उदो० ॥ चतुर्थीच्या दिवसी विश्वव्यापक जननी हो ॥ उपासकां
पाहसी अंबे प्रसन्न अंतःकरणे हो ॥ पूर्णरूपें पाहसी जगन्माते मन
मोहिनी हो ॥ भक्तांच्या माउली सुर ते येती लोटांगणी हो ॥ उदो० ४ ॥
पंचमी चे दिवशीं व्रत तें उपांगललिता हो ॥ अर्घ्यपाद्यपूजनें तुजला भवा
नीं स्तविती हो ॥ रात्रीचे समयीं करिती जागरण हरिकथा हो ॥ आनं
दें प्रेम तें सद्भावें क्रीडला हो ॥ उदो० ५ ॥ षष्ठीचे दिवशी भक्तां आनं-
द वर्षला हो ॥ घेउन दिवट्या हस्ती गोंधळ हर्षे घातला हो ॥ कवडी
एक अर्पितां देशी हार मुक्ताफळां हो ॥ जोगवा मागलां अंबा प्रस-

आरत्या ३

भ झाली भक्तकुळीं हो ॥ उदो० ॥ ६ ॥ सप्तमीचे दिवशी सप्तशृंगगडावरी हो ॥ तेथें तूं नांदसी भोंवती पुष्पें नानापरी हो ॥ जाई जुई-सेवती पूजा रेखीयली बरवी हो ॥ भक्त संकटीं पडतां झेलुनि घेसी वरचेवरी हो ॥ उदो० ॥ ७ ॥ अष्टमीचे दिवशीं अष्टभुजा नारायणी हो सह्याद्रीं परवती पाहिली उभी जगज्जननी हो ॥ मन माझें मोहिलें शरण आलों तुज लागुनी हो ॥ स्तनपान देउनी सुखी केलें अंतःकरणी हो ॥ उदो० ॥ ८ ॥ नवमीचे दिवशीं नवांदिवसाचें पारणें हो सहाशती जप होमहवनें सद्भक्ती करुनी हो ॥ षड्रस अन्ने नैवेद्यासी अर्पियली भोजनीं हो ॥ आचार्य ब्राह्मणा तर्पिलें तुसिया रूपें करुनी हो

॥ ३ ॥

उदो ॥ ६ ॥ दशमीच्या दिवशी अंबा निघे सीमा उल्लंघनीं हो ॥ सिंहा
रूढ होउनि दारुण शस्त्रें करिं घेउनी हो ॥ मारिले दानव शुंभनिशुं
भ ऐसे किती हो ॥ विप्र रामदास अंबेनें धरिलासे करीं हो ॥ उदो ॥

आरती श्रीशंकराची – लवथवती विक्राळा ब्रह्मांड माळा । वीषें कंठ
काळा त्रीनेत्री ज्वाळा । लावण्य सुंदर मस्तकीं बाळा । तेथुनियां ज-
ल निर्मळ वाहे झुळझुळा । जयदेव जयदेव जय श्रीशंकरा । आरति
ओंवाळू तुज कर्पूर गौरा ॥ धृ० ॥ कर्पूरगौरभोळा नयनवीशाळा । -
अर्धांगी पार्वती सुमनाच्या माळा । विभूतीचे उधळण शितिकंठ नीळा
ऐसा शंकर शोभे उभा वेल्हाळा । जय० २ ॥ देवीं दैत्यीं सागरमंथन पैं

आरत्या
४

केलें । त्यामाजीं अवचीतां हळहळ जें उठलें । तें त्वां असुरपणें प्राशन-
केलें । नीलकंठ नाम प्रसिद्ध झालें । जय० ३ ॥ व्याघ्रांबर फणिवरधर
सुंदर मदनारी । पंचानन मनमोहन मुनिजन सुखकारी । शतकोटी-
चें बीज वाचें उच्चारी । रघुकुळटिळक रामदासा अंतरी । जय० ४ ॥